सन २०१८-१९ या वर्षातील प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) अंतर्गत प्राप्त झालेला केंद्र शासनाच्या हिश्याचा (जनजाती क्षेत्र उपयोजना) निधी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०१९/प्र.क्र.९२/योजना-१०

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ०३ डिसेंबर, २०१९.

**वाचा :-**

१) उप सचिव, (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/०३/२०१८-RH (A/C)-१/B-Maharashtra, दि.२१.१०.२०१९ रोजीचे आदेश.

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. १४३२/न.क्र.१६९/ लेखा/(प्रआयो)/२०१९, दि.३०.१०.२०१९.

३) **शासन निर्णय क्रमांकः** आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.०८/कार्यासन.६, दि.३०.११.२०१९

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण या योजनेसाठी केंद्र शासनाने सन २०१८-१९ या वर्षातील पहिला हप्ता म्हणून सन २०१९-२० या वर्षात महाराष्ट्र राज्यास रू. १२५,३१,५८,०००/- (अक्षरी रूपये एकशे पंचवीस कोटी एकतीस लक्ष अठ्ठावन्न हजार फक्त) (जनजाती क्षेत्र उपयोजना) एवढा निधी संदर्भाधीन क्र. १ येथील आदेशान्वये मंजूर केलेला आहे. सदर निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१९-२० या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. व मागणी क्र. टी-५, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(०५) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (केंद्र हिस्सा) (२५०५ २९९२), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण - गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली

रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच, आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय दि. ३०.११. २०१९ तसेच, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ३९५/अर्थोपाय, दि.०५.११.२०१९ तसेच, शासन परिपत्रक वित्त विभाग दि. ०८.०७.२०१९ अन्वये दिलेल्या सुचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१९१२०३१२४९११७२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Pathak

Digitally signed by Hemant Sudhakar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, cn=Hemant Sudhakar Pathak
Date: 2019.12.04 11:07:35 +05'30'

**(हे.सु.पाठक)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन बेलापूर

५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) सामाजिक न्याय विभाग (वि.घ.योजना), मंत्रालय, मुंबई -३२.

७) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७) मंत्रालय मंबई-३२.

८) आदिवासी विकास विभाग (कार्या.का.६व १७) मंत्रालय, मुंबई-३२

९) अप्पर संचालक, एकात्मीक ग्रामीण विकास कक्ष, बांधकाम भवन, मुंबई-०१.

१०) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.

११) निवड नस्ती (योजना-१०)